२०१११०१४१६४३४४०01

प्रशिक्षण क्र.

एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत कुपोषण प्रतिबंधासाठी आणि स्तनदा व गरोदर माता आणि किशोरवयीन मुलींमध्ये परिवर्तन घडवणारे प्रेरक प्रशिक्षण बाबत ..

**महाराष्ट्र शासन**
महिला व बाल विकास विभाग,
शासन निर्णय ,क्रमांक :एबावि २०११ / प्र.क्र.२५६ / का-५
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १३ ऑक्टोंबर , २०११.

**वाचा** :- महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन, रायगड भवन, नवी मुंबई यांचे पत्र क्र. मिशन/प्रशिक्षण/२०११ दिनांक ४.८.२०११

## शासन निर्णय

एकात्मिक बाल विकास प्रकल्पात कुपोषण प्रतिबंधासाठी आणि स्तनदा माता व गरोदर माता आणि किशोरवयीन मुलींमध्ये परिवर्तन घडवून आणणारे प्रेरक (चेंज ऐजंट) प्रशिक्षित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन, नवी मुंबई यांनी त्यांच्या दिनांक ४.८.२०११ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार राज्यातील ३५ जिल्हयातील ५५३ प्रकल्पातील कुपोषण प्रतिबंधासाठी आणि ग्राम आरोग्य पोषण दिवस (VHND) या दिवशी स्तनदा व गर्भवती माता यांना तसेच किशोरवयीन मुलींच्या बैठकामध्ये त्यांना प्रशिक्षण देण्यासाठी प्रत्येक प्रकल्पात प्रत्येकी २० व्यक्ति याप्रमाणे ११०६० व्यक्तिंना प्रशिक्षित करण्यासाठी प्रथमतः ३० प्रशिक्षणार्थीचे १८४ प्रशिक्षण सत्र आयोजित करण्यासाठी रूपये ७५.०० लक्ष (रूपये पंच्याहत्तर लक्ष फक्त) इतक्या खर्चास या शासन निर्णयान्वये शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

या प्रशिक्षणाचे नियोजन महासंचालक, राज माता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन , नवी मुंबई यांचे मार्फत करण्यात येईल. प्रशिक्षणामध्ये प्रामुख्याने खालील प्रशिक्षणाचा समावेश राहील.

प्रशिक्षण क्रमांक -१ स्तनपान व शिशूपोषण (गरोदर स्त्रिची काळजी, अतिसार व तीव्र श्वसनदाह) असे एकूण चार दिवसाचे प्रशिक्षण

प्रशिक्षण क्रमांक -२ Management of Training प्रशिक्षण (चार दिवसाचे)

प्रशिक्षण क्रमांक -३ Attitude Change (पाच दिवसाचे )

महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन, नवी मुंबई यांनी वरील प्रशिक्षणाबाबतचा अहवाल शासनास व आयुक्त, महिला व बाल विकास यांना सादर करावा.

यासाठी होणारा खर्च सन २०११-१२ या वित्तीय वर्षासाठी मागणी क्र. एक्स-१, मुख्यलेखाशिर्ष २२३६-पोषण आहार, ०२ पोषक अन्न व पेये वितरण, १०१ , विशेष पोषण आहार कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना-ग्रामीण (०४) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ याच्या कलम १२३ व २६१ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदान (स्थानिक क्षेत्र) (केंद्र पुरस्कृत योजना ९०%) (२२३६००७२) ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षात उपलब्ध असलेल्या तरतूदीतून रूपये ६७.५० लक्ष (रूपये सदुसष्ट लक्ष पन्नास हजार फक्त) आणि मागणी क्र. एक्स-१, मुख्यलेखाशिर्ष २२३६- पोषण आहार, ०२, पोषक अन्न व पेये यांचे वितरण, १०१ , विशेष पोषण आहार कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना ( ग्रामीण) (०४) (०६) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ याच्या कलम १२३ व २६१ अन्वये एकात्मिक बाल विकास सेवा प्रकल्पाच्या आस्थापना विषयक बाबीसाठी जिल्हा परिषदांना अनुदान (१०% राज्य हिस्सा ) (२२३६१३७३) ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षात उपलब्ध असलेल्या तरतूदीतून रूपये ७.७५ लक्ष (रूपये सात लक्ष पंच्याहत्तर हजार फक्त) असा एकूण रूपये ७५.०० लक्ष (रूपये पंच्याहत्तर लक्ष फक्त ) इतका खर्च भागविण्यात यावा व तो त्याच लेखाशिर्षा खाली खर्ची टाकण्यात यावा.

याकरिता आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांना आहरण, संवितरण व नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक खर्चनि-१००६/प्र.क्र.१/अर्थोपाय, दि.२०.४.२००६ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

(श.पा.वारे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन , रायगड भवन, नवी मुंबई
आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे
संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
संबंधित उप मुख्य कार्यकारी अधिकारी ( बाल कल्याण / ग्राम पंचायत),
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,
सहाय्यक संचालक (लेखा ) महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
सर्व अधिकारी व सर्व कार्यासने , महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासन -५ निवड धारिका

164 G.R.2011